प्रशासकीय मान्यता :-

सन २०००-०१ ते २००४-०५ या कालावधीची पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाची पंचवार्षिक योजना (योजनेतर).

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक पीएलएफ-०१२०००/सीआर-१३/भाग-१८/पोल-४,

मंत्रालय मुंबई - ४०० ०३२. दिनांक १७ सप्टेंबर, २००१.

**वाचा :-** १) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र.VI/२१०११/३०/२०००-GPA-I, दि.१.८.२०००, समक्रमांकाची पत्रे दि.३१.१२.२०००, २२.२.२००१ व २९.३.२००१.

२) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.डीजीपी/१७/६१६२/एमओडी/२०००-२००५, दि.३०.७.२००१.

३) सह पोलीस आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.पोआ/कक्ष-२/र. व का./५/संबंको/३२८/०१, दि.३१.७.२००१.

४) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अ.शा.पत्र क्र.मुं./का/२१५२/२००१, दि.१०.८.२००१.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाने त्यांच्या दि.१८.९.२००० च्या पत्रान्वये सन २०००-०१ या वित्तीय वर्षापासून पोलीस दलाच्या आधुनिकीकरणासाठी राज्य शासनाला प्रतीवर्षी रु.९२.१० कोटी इतका निधी पुढील पाच वर्षात (सन २०००-०१ ते २००४-०५ पर्यन्त) देण्याचे मान्य केलेले आहे. सदर निधीपैकी ५०% रक्कम अनुदान म्हणून व ५०% रक्कम कर्ज म्हणून मिळणार आहे. सदर निधी मंजूर करतांना राज्य शासनाने सुध्दा तितकाच म्हणजे रु.९२.१० कोटीचा निधी पूरक निधी म्हणून (मॅचिंग ग्रँट) उपलब्ध करुन देण्याची अट केंद्र शासनाने घातलेली आहे. अशाप्रकारे प्रतिवर्षी एकूण रु.१८४.२० कोटी प्रमाणे ५ वर्षात एकुण रु.९२१ कोटी इतका निधी पोलीस दलाच्या आधुनिकीकरणासाठी उपलब्ध होणार आहे.

२. सन २०००-०१ करिताची पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाची योजना दि.२३.११.२००० च्या पत्रान्वये केंद्र शासनास सादर करण्यात आली होती. केंद्र शासनाने त्यापैकी रु.१६६.२० कोटी इतक्या रकमेची योजना दि.२९.३.२००१ च्या पत्रान्वये मान्य केलेली आहे. सदर निधीपैकी रु.५०.६२ कोटी इतका निधी दि.३१.३.२००१ पर्यंत पोलीस विभागाला उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. गतवर्षीचा व्यपगत झालेला निधी केंद्र शासनाने चालू सन २००१-०२ करिता पुनर्जिवित करुन दिलेला आहे.

GR-20020122153823000-0200

३. केंद्र शासनाच्या निदेशाप्रमाणे पोलीस विभागाने पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाची सन २०००-०१ ते २००४-०५ या कालावधीची पंचवार्षिक योजना (योजनेत्तर) तयार केलेली असून त्याचे विवरण खालील प्रमाणे आहे -

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशील | २०००-०१<br>पो.म.सं.<br>पो.आ.मुं.<br>एकुण | २००१-०२<br>पो.म.सं.<br>पो.आ.मुं.<br>एकुण | २००२-०३<br>पो.म.सं.<br>पो.आ.मुं.<br>एकुण | २००३-०४<br>पो.म.सं.<br>पो.आ.मुं.<br>एकुण | २००४-०५<br>पो.म.सं.<br>पो.आ.मुं.<br>एकुण | एकूण<br>पो.म.सं.<br>पो.आ.मुं.<br>एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | वाहने | ४३५४-०७<br>१८००-३८<br>६१५४-४५ | १८०४-३१<br>१५००-४०<br>३३०४-७१ | १७७०-६८<br>१४००-००<br>३१७०-६८ | ०५४६-३०<br>१२००-००<br>१७४६-३० | ०७७८-३५<br>१२००-००<br>१९७८-३५ | ९२५३-७१<br>७१००-७८<br>१६३५४-४९ |
| २ | शस्त्रे | ८२५-९६<br>१६८-८२<br>९९४-७८ | ३२८-४०<br>५००-०२<br>८२८-४२ | ०४७-००<br>१५०-००<br>१९७-०० | ०४७-००<br>१३०-००<br>१७७-०० | ०४७-००<br>२५०-००<br>२९७-०० | १२९५-३६<br>११९८-८४<br>२४९४-२० |
| ३ | आधुनिक दळण वळण | १३४४-६९<br>०७२२-०७<br>२०६६-७६ | १०१०-०८<br>०५००-००<br>१५१०-०८ | ६०९-८५<br>२७५-००<br>८८४-८५ | ९१३-०१<br>५००-००<br>१४१३-०१ | ३८३-१०<br>४००-००<br>७८३-१० | ४२६०-७३<br>२३९७-०७<br>६६५७-८० |
| ४ | साधन सामुग्री | २२६३-३७<br>०७५६-६३<br>३०२०-०० | १२९१-८७<br>०७२९-५८<br>२०२१-४५ | १५०३-८७<br>०४२५-००<br>१९२८-८७ | १३९९-३५<br>०२००-००<br>१५९९-३५ | १४७२-७९<br>०४००-००<br>१८७२-७९ | ७९३१-२५<br>२५११-२१<br>१०४४२-४६ |
| ५ | प्रशिक्षण | ०२०-००<br>१०८-०८<br>१२८-०८ | ०४१-००<br>२७०-००<br>३११-०० | ३७६-००<br>३००-००<br>६७६-०० | ---<br>१२०-००<br>१२०-०० | ---<br>१५०-००<br>१५०-०० | ४३७-००<br>९४८-०८<br>१३८५-०८ |
| ६ | पो.ठाणे इमारती व गृह निर्माण | २११२-५५<br>२१४४-००<br>४२५६-५५ | ४८२४-८२<br>४९००-००<br>९७२४-८२ | ४९९३-००<br>५८५०-००<br>१०८४३-०० | ६४४४-४१<br>६२५०-००<br>१२६९४-४१ | ६६१९-००<br>६०००-००<br>१२६१९-०० | २४९९३-७८<br>२५१४४-००<br>५०१३७-७८ |
| ७ | एकूण पोलीस | १०९२०-६४<br>५६९९-९८<br>१६६२०-६२ | ९३००-४८<br>८४००-००<br>१७७००-४८ | ९३००-४०<br>८४००-००<br>१७७००-४० | ९३५०-०७<br>८४००-००<br>१७७५०-०७ | ९३००-२४<br>८४००-००<br>१७७००-२४ | ४८१७१-८३<br>३९२९९-९८<br>८७४७१-८१ |
| ८ | वैज्ञानिक प्रयोगशाळा | १५२८-०० | ७२०-०० | ७२०-०० | ७२०-०० | ७२०-०० | ४४०८-२८ |
| | एकूण :- पोलीस + वैज्ञानिक प्रयोगशाळा | १८१४८-६२<br>(१८१-४९)<br>रुपये कोटी | १८४२०-४८<br>(१८४-२०)<br>रुपये कोटी | १८४२०-४०<br>(१८४-२०)<br>रुपये कोटी | १८४७०-०७<br>(१८४-७०)<br>रुपये कोटी | १८४२०-२४<br>(१८४-२०)<br>रुपये कोटी | ९१८७९-८१<br>(९१८-८०)<br>रुपये कोटी |

४. सारांशाने, पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या पंचवार्षिक योजनेत तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे वाहने, शस्त्रे, आधुनिक दळणवळण, साधनसामुग्री, प्रशिक्षण, पोलीस ठाणे इमारती व गृहनिर्माण, वैज्ञानिक प्रयोगशाळा, याबाबींकरिता एकूण रु.९१८.८० कोटी इतका खर्च येणार आहे. त्यापैकी पोलीस महासंचालक यांच्यासाठी रु.४८१.७२ कोटी आणि पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्यासाठी रु.३९३ कोटी इतका निधी उपलब्ध होणार आहे.

GR-20020122153823 06 -0206

५. पंचवार्षिक योजनेत न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळेसाठी रु.४४.०८ कोटी इतका निधी उपलब्ध होणार आहे.

६. बाबनिहाय विचार करता पंचवार्षिक योजनेत वाहनांसाठी रु.१६३.५४ कोटी, शस्त्रांसाठी रु.२४.९४ कोटी, आधुनिक दळणवळणाकरिता रु.६६.५८ कोटी, साधन सामुग्रीकरिता रु.१०४.४२ कोटी, प्रशिक्षणाकरिता रु.१३.८५ कोटी, पोलीस ठाणे इमारती व गृहनिर्माणाकरिता रु.५०१.३८ कोटी इतका निधी उपलब्ध होणार आहे. अशा प्रकारे पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या सन-२०००-०१ ते २००४-०५ या कालावधीच्या एकूण रु.९१८.८० कोटीच्या पंचवार्षिक योजनेस (योजनेतर) प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. सदर प्रशासकीय मंजूरी ही केंद्र शासनाकडून योजनेमध्ये केल्या जाणाऱ्या व त्यानुसार राज्य शासनाने करावयाच्या फेरबदलांच्या अधीन राहील.

७. पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या योजनेचे संनियंत्रण व अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने गृह विभाग शासन निर्णय क्र.पीएलएफ-०१०४/प्र.क्र.४/पोल-४, दि.१०.५.२००१ अन्वये गठित केलेल्या शक्ती प्रदत्त समितीच्या (Empowered Committee) मान्यतेनंतर पंचवार्षिक योजना तसेच प्रतिवर्षीची तपशीलवार वार्षिक योजना केंद्र शासनाला सादर करण्यात येईल.

८. पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या योजनेतंर्गत प्रशासकीय मान्यता मिळालेली साधनसामुग्री विकत घेतांना खरेदीसाठी शासनाने (उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भांखस-१०८८/२५१२/उद्योग-६, दि.२ जानेवारी,१९९२ अन्वये) विहित केलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा.

९. सदर योजना राबविण्यासाठी आवश्यक निधीची तरतूद प्रतिवर्षीच्या अर्थसंकल्पात मागणी क्र.बी-६, लेखाशीर्ष "२०५५-पोलीस, ११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण" खाली करण्यात येईल व सदर निधी विहित पध्दतीने पोलीस विभागाला उपलब्ध करुन देण्यात येईल.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.1106/२००१/व्यय-७, दि.१७.९.२००१ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(signature) 2/10/2001

( रा. वा. घाडगे )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

GR-200201221538230000-0200